## सरोवर संवर्धन योजना
## मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रासयो २०२४/प्र.क्र.१/आस्थापना-अ**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: २१ जून, २०२४.

**वाचा:** (१) एनएलसीपी २००५/प्र.क्र.२३/०५/तां.क.३, दिनांक ३ ऑक्टोबर, २००५.
(२) रासयो २००७/प्र.क्र.६५/ तां.क.३, दिनांक २० ऑक्टोबर, २००७.
(३) पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र. इएनटी २००८/प्र.क्र.६९/ तां.क.३, दिनांक २७ ऑगस्ट, २००८.
४) सुकाणू समितीच्या दि.३१.१०.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

तलाव, सरोवर आणि जलाशयांचे पर्यावरणाच्या संतुलनातील अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेऊन केंद्र शासनाने राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना सन २००१ पासून प्रथमतः प्रायोगिक तत्त्वावर व नंतर नियमितरीत्या सुरू केली आहे. या अंतर्गत राज्यातील तलावांचाही समावेश करण्यात आला आहे. तथापि, राज्यातील एकूण तलावांची संख्या विचारात घेता केंद्र शासनाच्या राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत त्या सर्व तलावांचा समावेश नजीकच्या कालावधीत होणे शक्य नसल्याने राज्य स्तरावर सन २००६-०७ पासून सरोवर संवर्धन योजनेची सुरुवात करण्यात आली. सरोवर संवर्धनाचे प्रस्ताव स्थानिक यंत्रणांकडून प्राप्त करणे, प्रस्ताव राष्ट्रीय वा राज्य स्तरीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट करण्याबाबत निर्णय घेणे, सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट असलेल्या / होणाऱ्या तलावांच्या कामांबाबत संनियंत्रण करणे व त्याबाबत गरजेनुरूप आवश्यक ते प्रशासकीय, आर्थिक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सरोवर संवर्धनाबाबत वेळोवेळी निर्गमित मार्गदर्शक सूचना, परिपत्रके, शासन निर्णय अधिक्रमीत करून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय व राज्यस्तरीय सरोवर संवर्धन योजनेची राज्यातील अंमलबजावणी पुढीलप्रमाणे असेल-

**अ) तलाव निवडण्याचे निकष :**

(१) केंद्र शासन वेळोवेळी राष्ट्रीय तलाव संवर्धन योजनेसाठी जे निकष निश्चित करेल ते सर्व संबंधितांना कळविण्यात येतील. सर्वसाधारणतः तेच निकष राज्य स्तरावरील तलाव संवर्धन योजनेसाठी असतील. राज्यातील अवर्षण प्रवण क्षेत्र, तलावाचे भौगोलिक स्थान पर्यावरणीय दृष्टया तलाव संवर्धनाची निकड व स्थानिक यंत्रणेचा सहभाग लक्षात घेता सुकाणू समितीच्या निर्णयानुसार तलाव संवर्धनाचे प्रस्ताव राष्ट्रीय स्तरावर मान्यतेसाठी पाठविण्यात येतील वा निधीच्या उपलब्धतेनुसार राज्य स्तरावरील योजनेत समाविष्ट करण्यात येतील.

(२) तलाव संवर्धन योजनेत तलावाचा समावेश करताना प्रामुख्याने पुढील बाबींचा विचार करण्यात येईल.

(i) तलावाचे क्षेत्र साधारणत: १ एकर व खोली-किमान ३ मीटर.

(ii) तलावातील एकूण सरासरी पाण्याची उपलब्धता (तलाव बारमाही असावा)

(iii) लाभक्षेत्राचा तलावावर होणारा परिणाम (जसे तलावाच्या जवळील लोकसंख्या, औद्योगिक आस्थापना, शेत जमीन, वनस्पती, झाडे, पक्षी इ.)

(iv) तलावाच्या पाण्याची प्रदुषण पातळी (मान्यताप्राप्त प्रयोगशाळा/यंत्रणेमार्फत मोजणी केलेले PH, TSS, BOD, COD, Nitrogen, Phosphorous इत्यादी घटकांचे पाण्यातील प्रमाण तसेच असल्यास पाणवनस्पतींनी व्याप्त क्षेत्र याबाबतचे अलीकडील महिन्यातील मापने.)

(v) तलावातील पाण्याचे नियोजन व व्यवस्थापनाबाबत सविस्तर माहिती, तलावाचे भौगोलिक स्थान (क्षेत्राची एकूण लोकसंख्या, हवामान, पर्जन्यमान, इ.)

(vi) तलावाच्या लाभक्षेत्रातील सद्यस्थितीतील वा संभाव्य घातक घटक (जसे गाळ भरणे, शेतीतील किटकनाशक व खते, परिसरातील सांडपाणी तलावात जाणे, नागरी घनकचरा तलावात फेकणे इत्यादी.)

(vii) तलावाची मालकी व पाण्याचे स्त्रोत.

(viii) स्थानिक स्वराज्य संस्थेव्दारे /यंत्रणेद्वारे तलाव संवर्धनार्थ प्रस्तावित करावयाची कामे व सक्रिय सहभागाची तयारी जसे-

१. तलावाच्या पाण्याच्या शुध्दीकरणासाठी प्रक्रिया वा उपाययोजना.

२. तलावाच्या काठाचे / बांधाचे मजबुतीकरण जसे कॉंक्रिटीकरण वगळून Stone Pitching.

३. तलाव क्षेत्रास कुंपण वा संरक्षण उपाययोजना-संमिश्र (Chain Link Fencing सह)

४. लाभक्षेत्रातील लोकसंख्येस आवश्यकतेनुसार सार्वजनिक सुविधा पुरविणे जसे शौचालय किंवा फिरते शौचालय, कचरापेटी.

५. तलाव नजीकच्या क्षेत्रातील सांडपाणी व्यवस्थापन.

६. सुशोभीकरण-जसे तलाव लगतच्या क्षेत्रात वनीकरण, वृक्षलागवड, सौर पथदिवे, पॅडल बोटींग.

७. जनजागृती.

८. प्रकल्प राबवण्यासाठी आवश्यक ती तांत्रिक तज्ञांची उपलब्धता.

९. सांडपाणी पुनर्वापरास प्रोत्साहन.

(ix) स्थानिकदृष्ट्या तलावासंबंधित महत्त्वाच्या अन्य बाबी.

(x) स्थानिक स्वराज्य संस्थेचे/ यंत्रणेचे गेल्या तीन वर्षातील सरासरी उत्पन्न व त्यांची योजनेत ठरल्याप्रमाणे हिस्सा उचलण्याची तयारी.

उपरोक्त कामांबाबत सविस्तर तपशीलासाठी "अनुसूची अ" कृपया पहावी.

**ब) तलाव निवडण्याची कार्यपध्दती:**

(१) तलाव निवडण्याचे जे निकष उक्त परिच्छेदात नमूद आहे, त्यानुसार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करेल.

(२) स्थानिक यंत्रणेने या कामी प्रशासकीय प्रमुखाच्या अध्यक्षतेखाली 'प्रकल्प अंमलबजावणी समिती' स्थापन करणे आवश्यक आहे. या समितीत प्रकल्पातील कामांशी संबंधित सर्व विभाग प्रमुखांचा समावेश असावा. आवश्यकतेनुसार पाणी पुरवठा, पर्यावरण व्यवस्थापन वा तलाव संवर्धन संबंधित क्षेत्रातील तज्ञांचा / संस्थेचा या समितीत समावेश करण्यात यावा. ही समिती DPR तयार करण्यासाठी शासकीय संस्था / प्राधिकरण / मंडळ यांची विहीत पध्दतीने निवड करेल. या संस्थेत आवश्यक तांत्रिक व तज्ञ मनुष्यबळ असणे गरजेचे आहे. DPR मध्ये नमूद खर्चाचे अंदाज हे जिल्हा अधिसूची दरावर (DSR) आधारभूत असतील. तसेच केंद्रीय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल विभागामार्फत निर्गमित मार्गदर्शक सुचनांनुसार Non-Core Work (जसे सौर पथदिवे, बेंच बसविणे, कचरापेटी इ.) कामांसाठी लागणारा निधी एकूण किमतीच्या २५ टक्के पेक्षा जास्त नसावा.

(३) स्थानिक स्वराज्य संस्था यांनी उक्त नमूद सविस्तर प्रकल्प अहवालाचे (DPR) तांत्रिक मुल्यांकन महाराष्ट्र जीवन प्राधिकरण किंवा सक्षम प्राधिकृत संस्थेद्वारे करून घ्यावे. तद्नंतर स्थानिक स्वराज्य संस्था महाराष्ट्र जीवन प्राधिकरण किंवा सक्षम प्राधिकृत संस्थेच्या तांत्रिक मान्यतेसह सविस्तर प्रकल्प अहवाल पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास सादर करेल. प्रकल्प खर्चातील स्थानिक यंत्रणेने उचलावयाच्या खर्चाचा (प्रकल्प कार्यान्वयन, देखभाल व दुरुस्तीसह) ठराव, प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत केल्याचे आदेश व अनुसूची ब मधील तलावाबाबत प्राथमिक माहितीही DPR सोबत स्थानिक स्वराज्य संस्थेकडून सादर करण्यात येईल. DPR तयार करणे व त्यास तांत्रिक मान्यता घेणे यासाठी लागणारा खर्च संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेच्या हिश्यातून करण्यात यावा.

(४) पर्यावरण विभागामार्फत प्राप्त प्रस्तावाची छाननी करण्यात येऊन आवश्यक तो अतिरिक्त तपशिल संबंधितांकडून प्राप्त करण्यात येईल. पर्यावरण विभाग प्राथमिक छाननीनंतर आवश्यक त्या सूचनांसह DPR चे सादरीकरण सुकाणू समितीसमोर आयोजित करेल.

(५) सुकाणू समिती मूल्यांकनाच्या आधारे सुयोग्य प्रस्तावांची निवड करेल. तसेच प्रकल्प प्रर्वतकाकडून अपेक्षित उदिष्टपूर्तिचे मानके निश्चित करण्यात येतील.

(६) सुयोग्य प्रस्तावातील केंद्र शासनाकडे सादर करावयाचे प्रस्ताव व त्याचा प्राथम्यक्रम तसेच राज्य स्तरावर राबवावयाच्या प्रस्तावांची अंतिम निवड सुकाणू समिती करेल. स्थानिक यंत्रणेद्वारे राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना वा राज्य सरोवर संवर्धन योजना यापैकी एका योजनेसाठी DPR सादर झाला तरी सुकाणू समिती तो राष्ट्रीय स्तरावरील योजने अंतर्गत राबवावयाचा की राज्य स्तरीय योजनेतर्गंत राबवावयाचा याबाबत निर्णय घेईल.

(७) सुकाणू समितीच्या निर्णयानुसार शासन मान्यतेने पूढील कार्यवाही पर्यावरण विभागामार्फत करण्यात येईल.

**क) आर्थिक सहाय्य:**

(१) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट असलेल्या वा होणा-या कोणत्याही तलाव संवर्धनाच्या प्रकल्पातील कोणत्याही खर्चाचा हिस्सा राज्य शासनामार्फत देण्यात येणार नाही. केंद्र

शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये राज्य शासनाचा म्हणून नमूद हिस्सा संबंधित स्थानिक यंत्रणेसच उचलावयाचा आहे.

(२) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट नसलेल्या ज्या तलाव संवर्धनाचे प्रकल्प राज्य स्तरावरील सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट होतील त्यांचा प्रकल्प खर्चातील हिस्सा खालीलप्रमाणे असेल-:

| **अ.क्र.** | **क्षेत्र** | **संबंधित यंत्रणेचा एकूण प्रकल्प खर्चातील किमान हिस्सा** |
|---|---|---|
| १ | "अ" वर्ग नगरपरिषदा व महानगरपालिका, कटक मंडळे इत्यादी | ३० टक्के |
| २ | "ब" वर्ग नगरपरिषद | २० टक्के |
| ३ | "क" वर्ग नगरपरिषद, नगरपंचायत, ग्रामपंचायत व ग्रामीण क्षेत्र | १० टक्के |

योजनेच्या यशस्वीतेसाठी प्रकल्पात अधिकाधिक लोकसहभाग आवश्यक असल्याने प्रकल्प खर्चात जास्तीत जास्त हिस्सा उचलणा-या स्थानिक स्वराज्य संस्थांचा प्राथम्याने विचार करण्यात येईल. उर्वरित प्रकल्प खर्च हिस्सा हा राज्य शासनामार्फत देण्यात येईल.

(३) राज्य स्तरावरील सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मान्यता (प्रशासकीय मान्यता) दिलेल्या तलाव प्रस्तावांना राज्य हिश्याची रक्कम तीन हप्त्यात वितरित करण्यात येईल. प्रत्येक वित्तीय वर्षात विभागास प्राप्त नवीन प्रस्तावांच्या तुलनेत यापूर्वी प्रशासकीय मान्यता देऊन काम प्रगतीपथावर असलेल्या व उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेल्या तलाव प्रस्तावांना प्राधान्याने निधी उपलब्ध करून देण्यात येईल. सदर योजनेंतर्गत केवळ GST अनुज्ञेय असेल. त्याशिवाय इतर कोणतेही शुल्क अनुज्ञेय असणार नाही.

४) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत वा राज्य स्तरावरील सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट असलेल्या वा होणा-या कोणत्याही तलाव संवर्धनाच्या प्रकल्पातील कार्यान्वयन, प्रकल्प देखभाल व दुरुस्तीच्या खर्चाचा हिस्सा राज्य शासनामार्फत देण्यात येणार नाही. तो संबंधित स्थानिक यंत्रणेसच उचलावयाचा आहे.

**ड) योजनेचे समन्वयन:**

(१) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट असलेल्या व होणा-या तसेच राज्यस्तरीय योजनेत समाविष्ट असलेल्या व होणाऱ्या प्रकल्पांशी संबंधित स्थानिक यंत्रणेस उक्त नमूद केल्याप्रमाणे 'प्रकल्प अंमलबजावणी समिती' स्थापन करणे अनिवार्य आहे.

(२) DPR तयार करणे, यासाठी विहित प्रक्रियेचे पालन करणे, मंजुरी प्राप्त कामे करून घेण्यासाठी निविदा / विहीत प्रक्रीयेचा अवलंब करणे, मंजुरी प्राप्त कामे करून घेत असताना पूर्ण होणा-या कामांचा पुढील साधारणतः पाच वर्षाच्या कालावधीसाठीचा देखभाल व दुरुस्तीचा समावेश ती कामे

पूर्ण करणा-या यंत्रणेसोबतच्या करारपत्रात करणे, प्रकल्पाकडून अपेक्षित उद्दिष्टपूर्तिचे निश्चित मानके पूढील कालावधीतही कायम रहाण्यासाठी संबंधित स्थानिक यंत्रणेचे मनुष्यबळ विकसित करणे यासारख्या बाबीत 'प्रकल्प अंमलबजावणी समिती' समन्वयन करेल. तसेच सदर समिती तलाव संवर्धनाच्या कामांच्या प्रगतीबाबत वेळोवेळी राज्य शासनास अवगत करेल.

(३) तलाव संवर्धनाची कामे आदेशाच्या दिनांकापासून/ धनादेशाच्या दिनांकापासून २४ महिन्यात किंवा तत्पूर्वी पूर्ण करावयाची आहेत. प्रकल्प मंजुरीच्या आदेशात नमूद प्रत्येक अटी व शर्तीचे पालन होत असल्याबाबतची दक्षता ही समिती घेईल. या समितीची दरमहा बैठक आयोजित करण्यात येऊन योजनेच्या प्रशासकीय, भौतिक व आर्थिक प्रगतीचा आढावा घेण्यात येईल व त्याचे कार्यवृत्त पर्यावरण विभागास पुढील महिन्याच्या १५ तारखेपूर्वी सादर करण्यात येईल.

(४) राज्य स्तरावर सुकाणू समितीमार्फत राज्यातील तलाव संवर्धनाच्या प्रकल्पांचा नियमित आढावा घेण्यात येईल. या समितीमार्फत वेळोवेळी दिलेल्या दिशा निर्देशांचे पालन करणे संबंधित स्थानिक यंत्रणेस बंधनकारक असेल.

(५) आवश्यकतेनुसार प्रकल्पातील खर्चाच्या बाबी व त्यासाठी मंजूर खर्चातील बदल वा सुधारणा करण्याचे अधिकार सुकाणू समितीस असतील.

**इ) सुकाणू समिती :**

सरोवर संवर्धन योजनेचे संनियंत्रण करण्यासाठी पुढीलप्रमाणे सुकाणू समिती गठीत करण्यात येते-

| | | |
|---|---|---|
| (१) प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | - | अध्यक्ष |
| (२) प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| (३) प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| ४) प्रधान सचिव, मृदा व जलसंधारण विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| (५) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| (६) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| (७ सचिव, जलसंपदा विभाग यांनी प्राधिकृत केलेले संबंधित उपसचिव. | - | सदस्य |
| (८) संचालक, नगर प्रशासन संचलनालय | - | सदस्य |
| ९) अध्यक्षांनी आवश्यकतेनुसार निमंत्रित केलेले संबंधित क्षेत्रातील २ तज्ञ व केंद्र शासनाचे अधिकारी. | - | निमंत्रित सदस्य |
| १०) शास्त्रज्ञ श्रेणी १/ उपसचिव/ सह सचिव/ संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | - | सदस्य सचिव |

**फ) सुकाणू समितीची कार्यकक्षा :**

(१) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना व राज्यस्तरीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट करावयाच्या तलावांच्या प्रस्तावासाठी निकष, मानके व मूल्यांकन पध्दती ठरविणे.

(२) प्राप्त प्रस्तावांतील निकष व मूल्यांकनाधारे सुयोग्य प्रस्तावांची निवड करणे.

(३) सुयोग्य प्रस्तावातील राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना व राज्यस्तरीय सरोवर संवर्धन योजनेंतर्गत प्रस्तावांच्या समावेशाबाबत व प्राथम्य क्रमाबाबत निर्णय घेणे.

(४) DPR मधील खर्चाचे अंदाज तपासून मान्यता देणे.

(५) खर्चाच्या बाबी व खर्च रक्कम यांत आवश्यकतेनुसार बदल / सुधारणा करणे.

(६) DPR तयार करणाऱ्या शासकीय संस्था / प्राधिकरणे/ यंत्रणा यांचे आवश्यकतेनुसार पॅनल तयार करणे व त्या संबंधित सर्व कार्यनियमावली ठरविणे.

(७) मंजूर खर्च रक्कम यंत्रणेस उपलब्ध करण्याची कार्यपद्धती ठरविणे.

(८) तलाव संवर्धन प्रस्तावास मान्यता देताना अटी व शर्ती ठरविणे.

(९) मंजुरी प्राप्त प्रस्तावांच्या प्रशासकीय, भौतिक व आर्थिक प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेणे व आवश्यक ते दिशा निर्देश देणे.

(१०) अटी व शर्तीचे पालन न करणाऱ्या स्थानिक यंत्रणेतील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेविरुध्द कारवाईचे निदेश देणे.

(११) आवश्यकतेनुसार प्रकल्पास भेट देऊन कामांच्या प्रगतीची पाहणी करणे.

(१२) योजनेचे यथायोग्य कार्यान्वयन होण्यासाठी सर्व आवश्यक प्रशासकीय, आर्थिक निर्णय घेणे व कार्यपध्दती ठरविणे.

(१३) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यस्तरीय धोरण ठरविणे.

**(ग) योजनेसाठी आर्थिक तरतूद व खर्चाचे लेखाशिर्ष-**

(१) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेत समाविष्ट असणा-या / होणा-या प्रकल्पांबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व "सुकाणू समिती" च्या निर्देशानुसार कार्यवाही करण्यात येईल. राज्यस्तरावरील योजनेत समाविष्ट असणाऱ्या व त्या आर्थिक वर्षात समाविष्ट करावयाच्या प्रकल्पांबाबत प्रकल्प अंमलबजावणी कालावधी निश्चित होऊन त्यानुसार राज्यस्तरावर व संबंधित स्थानिक यंत्रणेच्या स्तरावर खर्चाची तरतूद करण्यात येईल. राज्यस्तरावरील निधीचा हिस्सा पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग प्रत्येक आर्थिक वर्षात नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने किंवा त्यांनी घालून दिलेल्या पध्दतीने वितरीत करेल. यावर होणारा खर्च हा "३४३५, परिस्थितिकी व पर्यावरण, १०३ वायु व जल प्रदुषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षांतर्गत संबंधित आर्थिक वर्षी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल. या योजनेस वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५१/०७/व्यय-१६, दि. ०२.०३.२००७ अन्वये मान्यता दिली आहे.

**(घ)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या अधिकृत संकेत स्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०६२८१७२५५१८१०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.06.28 17:38:05 +05'30'

**( सु. कि. निकम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य.
(२) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य.
(३) मा. राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य.
(४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
(५) प्रधान सचिव(पर्यावरण व वातावरणीय बदल)
(६) प्रधान सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई .
(७) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
(८) प्रधान सचिव (मृदा व जलसंधारण विभाग), मंत्रालय, मुंबई.
(९) प्रधान सचिव (ग्रामविकास विभाग) मंत्रालय, मुंबई.
(१०) प्रधाव सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.
(११) सर्व विभागीय आयुक्त
(१२) सर्व जिल्हाधिकारी.
(१३) सर्व महानगरपालिका आयुक्त.
(१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
(१५) संचालक, नगरपालिका प्रशासन.
(१६) सर्व नगरपालिका, नगरपंचायत मुख्याधिकारी.
(१७) पर्यावरण विभागातील सर्व कार्यासने.
(१८) निवड नस्ती.

**रासयो २०२४/प्र.क्र.१/आस्थापना-अ, दि. २१ जून, २०२४ चे सहपत्र**

**"अनुसुची अ"**

| अ.क्र. | योजनेंतर्गत अनुज्ञेय असलेली कामे | योजनेंतर्गत अनुज्ञेय नसलेली कामे |
|---|---|---|
| | Core Work | |
| १ | सांडपाणी प्रक्रिया संयंत्र (STP) | Protection wall/ Retaining wall/ Compound wall |
| २ | वाळू काढणे (Desilting) | मुख्यत: कॉक्रीटीकरणाची कामे |
| ३ | जलपर्णी काढणे(De-weeding) | Bathing Ghat /Dhobi ghat and cattle drinking water tank |
| ४ | Dewatering | Approach Road |
| ५ | Stone Pitching | Aerators cum Fountain |
| ६ | Silt trap | Creating And Fixing Monuments |
| ७ | शौचालय(Toilet Block) | Centage charge/Contingency |
| ८ | Paver Block on Pathway | Royalty charge |
| ९ | Bund Strengthening | Labour Insurance/Work Insurance |
| १० | Pathway | Consultancy charge |
| ११ | Drainage Management System | Lab and Testing Charge |
| १२ | Disposal of Storm water | |
| | Non-Core Work | विसर्जन घाट |
| १३ | Construction of Chain Link Fencing | |
| १४ | Providing Solar Lamp Around Lake | |
| १५ | Providing And Fixing Benches and Dustbins (निर्माल्यकलश) | |
| १६ | Garden And Recreation Area (केवळ नागरी भागासाठी) | |
| १७ | Afforestation/ Plantation (वनीकरण/वृक्ष लागवड) | |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB88C7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.06.28 17:38:24 +05'30'

**(सु.कि.निकम)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**रासयो २०२४/प्र.क्र.१/आस्थापना-अ, दि. २१ जून, २०२४ चे सहपत्र**

**"अनुसुची ब"**

**तलावाबाबतचा प्राथमिक माहितीचा तक्ता**

| अ.क्र. | तपशील | माहिती |
|---|---|---|
| १ | तलावाचे नाव | |
| २ | तलावाची जागा (तालुका , जिल्हा) | |
| ३ | तलावाचे क्षेत्रफळ | हेक्टर |
| ४ | पाणी साठवण क्षमता | |
| ५ | तलावाची खोली | मीटर |
| ६ | तलावाच्या पाण्याचा स्रोत | |
| ७ | तलावातील पाण्य़ाचा कालावधी | वर्षभर/ काही महिने |
| ८ | तलावाची निर्मिती | नैसर्गिक/ मानवनिर्मित |
| ९ | तलावाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य | |
| १० | स्थानिक संस्थेचा वर्ग | अ/ब/क वर्ग |
| ११ | तलावाचे पाणलोट क्षेत्र | चौ.कि.मी. |
| १२ | पाणलोट क्षेत्राचे स्वरूप | डोंगराळ/ मैदानी इ. |
| १३ | पाणलोट क्षेत्राचा सध्याचा वापर | रहिवासी/ वनव्याप्त/शेती/ओसाड |
| १४ | पाणलोट क्षेत्रातील लोकसंख्या | |
| १५ | पाणलोट क्षेत्रातील सांडपाणी व्यवस्थापनाबाबत माहिती | सांडपाणी प्रक्रीया/पद्धत इ. |
| १६ | तलावात घनकचरा टाकला जातो का? (निर्माल्य, मूर्तिविसर्जन याबाबत माहिती देणे ) | |
| १७ | तलावाची मालकी (सात- बारा कागदपत्राची प्रत) | |
| १८ | तलावाच्या पाण्याचा सध्याचा वापर | |
| १९ | तलावाबाबतच्या पर्यावरणीय समस्या | |
| २० | तलावाच्या पाण्याची जलगुणवत्ता | मान्यताप्राप्त प्रयोगशाळा/ यंत्रनेमार्फत मोजणी केलेले PH,TSS,BOD,COD,Nitrogen,Phosphorous इ.घटकांचे पाण्यातील प्रमाण, |
| २१ | तलावाची प्रदूषण पातळी | कमी/मध्यम/जास्त |
| २२ | तलाव परिसरातील जैवविविधता | |
| २३ | तलावातील पाणवनस्पतींनी (जलपर्णी) व्याप्त क्षेत्र. | |
| २४ | तलावाच्या पाण्याची प्रदूषणाची कारणे | सांडपाणी- औद्योगिक |

| | | |
|---|---|---|
| | | सांडपाणी-शेतातून येणारे, कपडे-गुरे धूणे. |
| २५ | तलावाबाबत यापूर्वी प्रकाशित झालेला अहवाल/ शास्त्रीय अभ्यास इ. माहिती | |
| २६ | तलाव प्रदूषण व संवर्धनाबबात स्थानिक लोकांमध्ये जागरूकता | आहे /नाही |
| २७ | तलाव संवर्धनाचे काम यापूर्वी केले असल्यास त्याबाबतची माहिती | |
| २८ | सध्या सदर तलाव संवर्धनासाठी किंवा सुशोभिकरणासाठी इतर योजनांमधून निधी मिळत असल्यास किंवा प्रस्तावित असल्यास त्याबाबतची माहिती. | |
| २९ | तलाव व तलाव परिसरातील वनस्पती, प्राणी, पक्षी इ. साठी असलेले अधिवास/आसरा याबाबत माहिती | |
| ३० | स्थानिक संस्थेचा हिस्सा जमा करण्याबाबतचे हमीपत्र सादर करावे. | |
| ३१ | तलाव संवर्धन पूर्ण झाल्यावर त्याची देखभाल व दुरूस्ती करणेबाबत स्थानिक संस्थेचा ठराव | |
| ३२ | तलावाच्या पाण्याच्या सद्यस्थिती गुणवत्ता अहवाल(तलाव क्षेत्रातील विविध ठिकाणाहून (किमान ५ ते ६)) | |
| ३३ | प्रस्तावित कामे | |
| ३४ | प्रस्तावित निधी | |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.06.28 17:38:42 +05'30'

**(सु.कि.निकम)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**